**परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यु उपदान व रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान तसेच शासन सेवेतून निवृत्त झालेल्या / होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान अनुज्ञेय करण्याच्या अनुषंगाने कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : रानिप्र-२०२३/प्र.क्र.५७ /सेवा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: ३०.०५.२०२४.

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- रानियो-२०२३/प्र.क्र.५७/ सेवा ४, दिनांक २४.०८.२०२३.
२) शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- रानियो-२०२३/प्र.क्र.५७/ सेवा ४, दिनांक २०.११.२०२३.

**शासन शुध्दीपत्रक :**

संदर्भाधीन क्र.१ येथील परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट १ व परिशिष्ट-२ मधील परिच्छेद (ब) (२) मधील उपपरिच्छेद २.१ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे-

"यासाठी कार्यालय प्रमुख / आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये मृत्यूसमयी जमा असलेल्या संचित रकमेचे वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अंनियो २०१७/प्र.क्र.२६/सेवा-४, दिनांक २८.०७.२०१७ व वित्त विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : अंनियो २०१७/प्र.क्र.२६/सेवा-४, दिनांक १८.११.२०२१ मधील तरतूदीनुसार Error Rectification Module व्दारे रक्कम परत मागविण्यासाठी अधिदान व लेखा कार्यालय / जिल्हा कोषागार कार्यालयाकडे परिपूर्ण प्रस्ताव सादर करावा."

ऐवजी

"यासाठी कार्यालय प्रमुख / आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये मृत्युसमयी जमा असलेली संचित रक्कम परत मागविण्यासाठी निवृत्तिवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांचे Exit and Withdrawal Under the National Pension System Regulations २०१५ मधील विनियम ६ (ई) व तदनंतर वेळोवेळी सुधारणा झालेल्या तरतुदीनुसार आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबाकडून विहीत नमुन्यात माहिती प्राप्त करुन आवश्यक कागदपत्रांसह Online Family Pension Exit Withdrawal चा प्रस्ताव अधिदान व लेखा कार्यालय / जिल्हा कोषागार कार्यालयाकडे सादर करण्यात यावा."

तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट-१ व परिशिष्ट-२ मधील परिच्छेद (ब) (२) मधील उपपरिच्छेद २.२ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे §

"आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या आधारे अधिदान व लेखा कार्यालय / जिल्हा कोषागार कार्यालय यांनी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA-Protean) प्रणालीवर Error Rectification Module व्दारे मृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जमा असलेली

एकूण संचित रक्कम परत मागवावी. मृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यातील संचित रकमेतील कर्मचाऱ्याचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम आणि शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम याची स्वतंत्र परिगणना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA-Protean) यांचेकडून करून यावी."

**ऐवजी**

"आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या आधारे अधिदान व लेखा कार्यालय/ जिल्हा कोषागार कार्यालय यांनी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA-Protean) प्रणालीवर Online Family Pension Exit Withdrawal ला मंजूरी द्यावी. मृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यातील संचित रकमेतील कर्मचाऱ्याचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम आणि शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम याची स्वतंत्र परिगणना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA-Protean) यांचेकडून करुन घेण्यात यावी."

हा शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०५३०११४४०४८८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHENDRA VASUDEO SAWANT

Digitally signed by MAHENDRA VASUDEO SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=2980b956e22df31e754bfa741ede3b0ce521766d70a5a0f519ce680c7720c62c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0A56D92AE953B5EAA843CB3E24FA77EE18B9B8002449C61D77EACFC80097E60A, cn=MAHENDRA VASUDEO SAWANT
Date: 2024.05.30 11:56:57 +05'30'

**( महेंद्र सावंत )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) मुख्य लेखा परीक्षा, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
९) उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद.
१४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
१५) राज्यपालांचे सचिव.
१६) मुख्यमंत्र्यांचे सचिव.
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव.

१८) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई.
१९) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
२०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२१) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२२) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२३) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
२४) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२५) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व).
२६) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
२७) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१.
२८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
२९) मंत्रालयातील सर्व विभाग.